66

201101201555647001

श्री•शिवाजीराव पाटील, भाप्रसे यांची पुणे महानगरपालिकेच्या विशेष कार्य अधिकारी या पदावर नियुक्ती करण्याबाबत•

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक पीएमसी ३०९०/२५६६/प्र•क्र•२०३/९०/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ४ मार्च १९९१•

शासन निर्णय :- श्री•शिवाजीराव पाटील, भाप्रसे यांची पुणे महानगरपालिकेतील विशेष कार्य अधिकारी या पदावर दिनांक १२•७•९० [मध्यान्हपूर्व] पासून प्रथमत: एक वर्षासाठी प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यास या आदेशानुसार शासन मंजुरी देत आहे• प्रति नियुक्तीच्या अटी व शर्ती सोबत जोडलेल्या सहपत्रानुसार असतील•

२• हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीनुसार [वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर १००/९१/सेवा २ दिनांक १९•२•१९९१] अन्वये निर्गमित करण्यात येत आहे•

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ध. नं. तलरेजा
[ धं• नं• तलरेजा ]
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव•

प्रति,

आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे,
विभागीय आयुक्त, पुणे,
जिल्हाधिकारी, पुणे,
सामान्य प्रशासन विभाग का९, ९-अ, व १०,
वित्त विभाग [सेवा-२],
श्री•शिवाजीराव पाटील, विशेष कार्याधिकारी, पुणे महानगरपालिका, पुणे•

श्री• भिमाजीराव पाटील यांच्या विशेष कार्य अधिकारी, पुणे महानगरपालिका या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीबाबतच्या शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र•पीएमसी ३०९०/१५६६/प्र•क्र•२०३/९०/नवि-२२, दि• ४ फेब्रुवारी १९९१ चे सहपत्र•

---

१] श्री• भिमाजीराव पाटील यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दि• १२ जुलै, १९९० [म०•पू] पासून एक वर्षाकरिता राहिल• भविष्यात श्री•पाटील यांच्या प्रतिनियुक्तीस एक वर्षाहून अधिक कालावधी करीता मुदतवाढ द्यावयाची झाल्यास त्याबाबतचा प्रस्ताव कमित कमी तीन महिने आधी नगर विकास विभागाकडे पाठवावा. जर शासनाला त्यांच्या सेवेची तत्पूर्वी आवश्यकता भासली तर त्यांना शासनाकडून परत केव्हाही बोलावण्यात येईल•

२• प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री•पाटील हे पुणे महानगरपालिकेत विशेष कार्य अधिकारी हे पद धारण करतील व त्यांना महानगरपालिकेकडून दि• १२ जुलै, ९० [म•पू] पासून भाप्रसे अधिका-यांच्या कनिष्ट प्रशासन वेतनश्रेणी [३९५०-५०००] वेतन, अधिक शासनाच्या दराने महागाई भत्ता व स्थानिक पूरक भत्ता तसेच द•म• रू• ४००/- विशेष वेतन मिळेल• मात्र श्री•पाटील यांचे वेतन अधिक विशेष वेतन, वेतन श्रेणीच्या कमाल मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही•

३• श्री•पाटील यांचा पदग्रहण कालावधी, वेतन आणि भत्ते तसेच पुणे महानगर पालिकेकडे बदली झाल्यानंतर व महानगरपालिकेकडून प्रत्यावर्तन झाल्यावर त्यांची भाप्रसेवेतील सदस्य म्हणून ज्या पदी नेमणूक होईल त्या पदावर रुजू होईपर्यंत त्यांना प्रवास भत्ता अखिल भारतीय सेवेतील अधिका-यास लागू असलेल्या नियमानुसार विनियमित होतील व त्यावरील खर्च पुणे महानगरपालिकेस द्यावा लागेल•

४] श्री•पाटील यांना जर ते पुणे महानगरपालिकेच्या सेवेत असताना आणि त्या सेवेमुळे काही विकलांगता निर्माण झाली आणि सदर असमर्थता अशी सेवा समाप्त झाल्यानंतर दिसून आली तरीसुध्दा जी काही असमर्थता रजा द्यावी लागेल त्या रजेच्या पगाराचा खर्च पुणे महानगरपालिकेने दिला पाहिजे•

५] श्री•पाटील हे पुणे महानगरपालिकेच्या स्वीयेतर सेवेमध्ये असताना ते रजेवर किंवा प्रशिक्षणासाठी गेल्यास व दरम्यानच्या कालावधीत त्यांच्या जागी अन्य अधिका-यांची नियुक्ती केली तरी, श्री•पाटील हे रजेवरुन किंवा प्रशिक्षणाहून परत आल्यावर शासनाने त्यांची अन्य पदावर नियुक्ती केल्यानंतर त्यांनी त्या पदाचा कार्यभार स्विकारेपर्यंतच्या कालावधीचे त्यांचे रजावेतन किंवा कर्तव्य वेतन व इतर अनुषंगिक भत्ते पुणे महानगरपालिकेने अदा करावेत•

६] श्री• पाटील यांना अनुज्ञेय असलेले वैद्यकीय सहाय्य आणि रजा प्रवास सवलतीचे हक्क जर ते प्रतिनियुक्तीवर आले नसते तर त्यांना अखिल भारतीय सेवा [वैद्यकीय

यामधील तरतुदीनुसार मिळणा-या सवलतीपेक्षा कोणत्याही प्रकारे कमी प्रतीचे असता कामा नये.

७] श्री.पाटील हे ज्या कालावधीसाठी ते पद धारण करतील तोपर्यन्त पुणे महानगर-पालिका त्यांना भाडेमाफ निवासस्थान देईल अथवा जर ते स्वत:च्या घरात राहत असतील तर पुणे महानगरपालिकेकडून त्यांना अनुज्ञेय घरभाडे भत्ता मिळण्यास ते पात्र होतील.

८] महानगरपालिकेची कामे पार पाडण्यासाठी पुणे महानगरपालिका श्री.पाटील यांना महानगरपालिकेची मोटार गाडी विनाशुल्क वापरण्यास देईल. मात्र, खाजगी कामासाठी केलेला प्रवास व त्यासाठी असलेली भाडे आकारणी शासन निर्णय, वित्त विभाग क्र.प्रवास-१०८७/प्र.क्र.४६४/८७/सेवा-५, दिनांक १७/८/१९८८ नुसार ततेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र.प्रवास-१०९०/प्र.क्र.३२०/९०/सेवा-५, दि.१७/१०/१९९० नुसार करण्यात येईल. त्या आदेशातील तरतुदीनुसार पेट्रोल व डिझेलवर चालणा-या महानगर-पालिकेच्या वाहनांच्या वापरासाठी दर किलोमिटरला सरसकट रु.४/- या प्रमाणे वसुली करण्यात येईल. खाजगी वापरासाठीची कमाल मर्यादा २५० किलोमिटर प्रतिमाह इतकी असेल यापेक्षा अधिक खाजगी वापरास परवानगी असणार नाही. खोळंबण्यासाठी प्रत्येक तासास रु.२ व प्रतिदिवशी कमाल रु.२०/- आकारले जातील. खोळंबण्याचा काळ मोजतांना पहिल्या तीन तासांचा वापर सोडण्यात यावा.

९] श्री.पाटील हे विशेष कार्य अधिकारी म्हणून काम करीत असलेल्या कालावधीकरिता विहित मुदतीमध्ये आणि वेळोवेळी प्रचलित असलेल्या दराने अखिल भारतीय सेवा नियमांतील तरतुदींना अधीन राहून श्री.पाटील यांच्या बाबतीत रजा आणि सेवानिवृत्ती वेतन अंशदान वर्गणी पुणे महानगरपालिका शासनाकडे शा.प.क्र.साप्रवि-संकीर्ण १०९०/प्र.क्र.९१/९०/ नऊ-अ, दिनांक २२/८/१९९० मधील तरतुदीनुसार देईल. रजा वेतनाची वर्गणी "००७०-इतर प्रशासकीय सेवा-६०-इतर सेवा-८०० इतर जमा रकमा [नऊ] रजा वेतन अंशदाने" या शीर्षाखाली व सेवानिवृत्ती वेतनाची वर्गणी" ००७१-निवृत्ती वेतने व इतर सेवानिवृत्ती लाभ यांच्या वसुली संबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा-०१-नागरी-१०१-अभिदाने व अंशदाने [एक] स्वीयेतर सेवेतील अधिकारी" या शीर्षाखाली जमा करण्यात यावी.

१०] शासकीय सेवेमध्ये श्री.पाटील यांना जे रजेचे फायदे शासनाच्या नियमाप्रमाणे मिळतात त्याच नियमानुसार रजेचे फायदे त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत लागू होतील.

११] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.आयएएस-१२७०/४४३०, दि.१७ फेब्रुवारी, १९७६ नुसार शासनाची सेवा करणा-या ए.आय.एस.अधिका-यांना लागू असलेल्या तरतुदीप्रमाणे सदर महानगरपालिका श्री.पाटील यांना रजा वटविण्याचा फायदा देईल.

१२] पुणे महानगरपालिकेच्या सेवेमध्ये असताना आणि सदर सेवेच्या शेवटी घेतलेल्या रजेच्या कालावधीसाठी [वटवलेली रजा धरून] दयावयाच्या कोणत्याही पूरक भत्त्याबाबतचा श्री.पाटील यांचा संपूर्ण खर्च पुणे महानगरपालिकेने सोसला पाहिजे.

८९|५

१३] महानगरपालिकेने श्री॰पाटील यांजकडून द॰म॰रुपये १२०/– [रुपये एकशे वीस फक्त] जेआयएस [ग्रुप इन्शुरन्स] योजना १९८१ साठी वसूल करावेत॰ आणि महालेखापाल, महाराष्ट्र–१, मुंबई यांच्याकडे सदर रकमेचा भरणा "८६५८–सस्पेन्स अकौंटस्–१२३–एलआयएस ऑफिसर्स ग्रुप इन्शुरन्स स्कीम–सबस्क्रीप्शन, आयएएस" या लेखाशिर्षाखाली नियमितपणे करावा॰"

१४] वरील अटी आणि शर्तीमध्ये ज्या गोष्टींचा समावेश झालेला नाही अशा इतर सर्व बाबतीत राज्य कारभार विषयक सेवा करणाऱ्या आय॰ए॰एस॰ सभासदांना लागू असलेले नियम, विनियम व कार्यकारी आदेश श्री॰पाटील यांना लागू होतील॰